**प्रधानमंत्री सौर कृषी पंप योजना (कुसुम) (ब) या योजनेकरिता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण करणेबाबत.**
**(लेखाशिर्ष २८१००९९२)**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२२/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- १७ फेब्रुवारी, २०२३

<u>वाचा</u> :- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२ व दि.०८.०२.२०२३
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाची नस्ती क्र.सौरप-२०२२/प्र.क्र.२०७/ऊद्योग-७
३) शासन निर्णय समक्रमांक दि.२०.०९.२०२२

**शासन निर्णय :-**

मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम या योजनेसाठी अनुसूचित जाती घटकांकरिता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २८१०-नवीन व नवीकरणीय ऊर्जा, ००, ७८९ अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०१) मुख्यमंत्री सौर कृषी पंप योजना (कार्यक्रम) (२८१००९९२) या लेखाशिर्षाखाली ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या उद्दिष्टामध्ये रु.८०००.०० लाख इतका नियतव्यय मंजूर असून आतापर्यंत रु.३३.६० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील दि.४.४.२०२२ व दि.०८.०२.२०२३ रोजीच्या परिपत्रकान्वये निधी वितरीणाबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन अनुसूचित जाती घटक कार्यक्रमातंर्गत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने वाचा क्र.२ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार प्रधानमंत्री सौर कृषी पंप योजना- कुसुम या योजनेसाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पीत निधीपैकी (२८१००९९२) या लेखाशिर्षाखाली ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या उद्दिष्टामध्ये रु.४६.४० कोटी इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.४.४.२०२२ व दि.०८.०२.२०२३ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०४.०४.२०२२ दि.०८.०२.२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०२२०१२४७५३४४२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, pseudonym=81399435626E9FEA18299D95CAA243F02DC0029F, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2023.02.20 12:51:49 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पशुसंवर्धन आयुक्तालया शेजारी, औंध, पुणे
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (ऊर्जा-७), मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग.